**केरळमधील अतिवृष्टीमुळे बाधीत पुरग्रस्तांचे पुनर्वसन करण्यासाठी श्री विठ्ठल रुक्मिणी मंदिरे समिती, पंढरपूर मार्फत अर्थसहाय्य मंजूर करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्र. पाटीए-१३१८/१३८८/प्र.क्र.१४६/का.१६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २३ ऑगस्ट, २०१८.

संदर्भ:- कार्यकारी अधिकारी, श्री विठ्ठल रुक्मिणी मंदिरे समिती, पंढरपूर, जि. सोलापूर यांचे पत्र क्र. आस्थापना/का.वि./६७३/२०१८, दि.२२.०८.२०१८

**प्रस्तावना :-**

केरळमध्ये अलिकडे झालेल्या अतिवृष्टीमुळे जिवित व वित्तहानी मोठ्या प्रमाणात झाली आहे. या अतिवृष्टीमुळे लाखो कुटुंब बेघर झालेली आहेत. पुरामुळे केरळमधील स्थिती अत्यंत भयावह झाल्यामुळे देशातून तसेच परदेशांतून मोठ्या प्रमाणात पुरस्थिती नियंत्रणात आणण्यासाठी आणि पुरग्रस्तांचे पुनर्वसन करण्यासाठी देशातून तसेच परदेशांतून मोठ्या प्रमाणात मदत देणे सुरु आहे. महाराष्ट्र शासनाकडून केरळ राज्यातील पुरग्रस्तांच्या पुनर्वसनासाठी रु. २० कोटी इतक्या रकमेच्या अर्थसहाय्याची घोषणा केली आहे. केरळ सरकारकडूनही पूरग्रस्त स्थिती हाताळण्यासाठी सढळ हस्ते मदत करण्याचे आवाहन केले आहे. महाराष्ट्र शासनाने केरळ पुरग्रस्तांच्या मदतीसाठी Chief Minister Kerala flood Relief Fund स्थापन केला आहे.

कार्यकारी अधिकारी, श्री विठ्ठल रुक्मिणी मंदिरे समिती, पंढरपूर यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्रान्वये मानवतावादी भुमिकेतून व सामाजिक उत्तरदायित्व म्हणून मंदिर समितीमार्फत रु. २५ लाख इतका निधी आर्थिक सहाय्य म्हणून मंदिर समितीमार्फत देण्यास मंजूरी देण्याची विनंती केलेली आहे.

सदर विनंतीच्या अनुषंगाने श्री विठ्ठल रुक्मिणी मंदिरे समिती, पंढरपूर यांच्यातर्फे केरळमधील अतिवृष्टीमुळे बाधीत पुरग्रस्तांच्या पुनर्वसनासाठी महाराष्ट्र शासनाद्वारे स्थापित Chief Minister Kerala flood Relief Fund साठी निधी देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय:-**

अतिवृष्टीमुळे बाधीत केरळ राज्यामधील पूरग्रस्तांच्या पुनर्वसनासाठी महाराष्ट्र शासनाद्वारे स्थापित "Chief Minister Kerala flood Relief Fund" यासाठी रु. २५ लाख इतका निधी श्री विठ्ठल रुक्मिणी मंदिरे समिती, पंढरपूर यांचेकडून अर्थसहाय्य देण्यास "एक विशेष बाब" म्हणून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१८०९१११५४६२६१८१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Salunke Sunita Parag
Date: 2018.09.11 15:50:40 +05'30'

**( सु.प.साळुंके )**
**कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग.**

**प्रति:-** १) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा.राज्यमंत्री, विधि व न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा अध्यक्ष, श्री विठ्ठल रुक्मिणी मंदिरे समिती, पंढरपूर, जि. सोलापूर
४) कार्यकारी अधिकारी, श्री विठ्ठल रुक्मिणी मंदिरे समिती, पंढरपूर, जि. सोलापूर
५) निवड नस्ती/का.१६.